राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील (Scheduled Area) गट-क मधील रिक्त पदे भरण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन परिपत्रक क्र. एपिटी-२०१४/प्र.क्र -१५३/आस्था-८,

**२५- मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट,**
**मुंबई-४०० ००१,**
**दिनांक : ५ ऑगस्ट , २०१४.**

वाचा -

१) केंद्रिय विधी व न्याय मंत्रालय, अधिसूचना क्र. जी.एस.आर.८७६(ई), दिनांक २-१२-१९८५.
२) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांची क्र.आरबीटीसी/ई-१३०१३(४)/नोटिफिकेशन-१/४७४/२०१४, दिनांक ९-६-२०१४ ची अधिसूचना.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीसीसी-२०१४/प्रक्र-२१३/ए/१४/१६-ब, दिनांक ३१-७-२०१४

**परिपत्रक :**

उपरोक्त संदर्भाधीन केंद्रिय विधी व न्याय मंत्रालय, अधिसूचना दिनांक २-१२-१९८५ अन्वये राज्यातील १२ जिल्ह्यातील गावनिहाय अनुसूचित क्षेत्र अधिसूचित करण्यात आले आहे. राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील नागरिकांच्या सर्वांगीण विकासाच्या अनुषंगाने या क्षेत्रामध्ये राबविण्यात येणाऱ्या विविध योजना क्षेत्रातील रहिवाशी असलेल्या कर्मचाऱ्यांच्या माध्यमातून राबविल्यास या क्षेत्राचा सर्वांगीण विकास होईल या दृष्टीकोनातून मा. राज्यपाल महोदयांनी जिल्हा परिषदेतंर्गत कार्यरत ग्रामसेवक, अंगणवाडी पर्यवेक्षक, आरोग्य सेविका (A.N.M.), आरोग्य सेवक (M.P.W.) ही ग्रामस्तरावर कार्यरत पदे स्थानिक रहिवासी उमेदवारांमधूनच भरण्याबाबत मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांनी उपरोक्त दि. ९-६-२०१४ च्या अधिसूचनेद्वारे निर्देश दिलेले आहेत. अशी पदे भरताना स्थानिक अनुसूचित जमाती उमेदवाराची व्याख्या खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आलेली आहे :-

“ Local scheduled tribe candidate means those scheduled tribe candidates who have themselves or whose parents or grandparents have been continuously residing in the scheduled area of the respective district since 26th Jan. 1950 till date.

मा. राज्यपाल महोदयांनी अधिसूचनेद्वारे दिलेल्या आदेशानुसार राज्यातील सर्व अनुसूचित क्षेत्रातील उपरोक्त १० पदांवरील कर्मचारीवृंदाची नियुक्ती स्थानिक अनुसूचित जमातीमधील उमेदवारामधून करणे बंधनकारक असून याद्दष्टीने खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

अ) अधिसूचनेतील तरतुदीनुसार अनुसूचित क्षेत्रातील उपरोक्त पदांवर स्थानिक आदिवासी उमेदवारातून नियुक्ती करणे बंधनकारक आहे. तथापि, सद्य:स्थितीत जिल्हानिहाय आरक्षण टक्केवारीनुसार पदभरती झालेली असल्याने व अनुसूचित क्षेत्रात अन्य प्रवर्गातील कर्मचारी कार्यरत असल्यामुळे अधिसूचनेतील तरतुदीची अंमलबजावणी टप्प्याटप्प्याने करण्यात यावी.

आ) त्यानुसार सद्य:स्थितीत अनुसूचित क्षेत्रातील उपरोक्त संवर्गातील १००% रिक्त पदे स्थानिक अनुसूचित जमाती उमेदवारांमधून भरणे बंधनकारक राहील.

इ) अनुसूचित क्षेत्रातील रिक्त पदे भरताना एकूण रिक्त पदांपैकी १/३ पदे स्थानिक आदिवासी महिलांसाठी राखीव ठेवण्यात यावीत.

ई) अनुसूचित क्षेत्रातील रिक्त पदे स्थानिक उमेदवारांमधून भरणे आवश्यक असल्याने या रिक्त पदांसाठी वेगळी जाहिरात प्रसिध्द करण्यात यावी.

उ) अनुसूचित क्षेत्रासाठी जाहिरात देताना सदरहू उमेदवार बदलीपात्र असणार नाही असे जाहिरातीत तसेच नियुक्तीपत्रात स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. तसेच सदरहू नियुक्त्या मा. राज्यपाल महोदय यांनी निर्गमित केलेल्या अधिसूचनेच्या अनुषंगाने करण्यात येतील / येत आहेत असेही जाहिरातीत तसेच नियुक्तीपत्रात स्पष्ट करावे.

ऊ) मा. राज्यपाल महोदयांच्या अधिसूचनेत नमूद केल्याप्रमाणे उपरोक्त परिच्छेद-१ मध्ये नमूद जिल्हा परिषद अंतर्गत कार्यरत ग्रामसेवक, अंगणवाडी पर्यवेक्षक, आरोग्य सेविका (A.N.M.), आरोग्य सेवक (M.P.W.) या ४ पदांकरिताच १०० टक्के आरक्षणाचे धोरण अनुसूचित क्षेत्रासाठी लागू असेल. जिल्हा परिषदांतर्गत अन्य प्रवर्गातील पदांसाठी जिल्हानिहाय रोस्टरनुसार निश्चित केलेली प्रवर्गनिहाय टक्केवारी लागू राहील.

२. शासनाच्या वेबसाईट www.maharashtra.gov.in वर संगणक संकेतांक क्रमांक २०१४०८०५१०३६२२९०२० हे शासन परिपत्रक उपलब्ध करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Eknath Kulkarni

Digitally signed by Anil Eknath Kulkarni
DN: CN = Anil Eknath Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Reason: I am approving this document
Date: 2014.08.19 16:45:14 +05'30'

( अ.ए. कुलकर्णी )

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व जिल्हाधिकारी,
३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
४) सर्व सह / उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
५) निवड नस्ती, कार्यासन आस्था.-८